


**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन ज्ञापन क्र. सानुग्र-२०२१/९०८/प्र.क्र.१५८/कार्यासन -६**

मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२

दिनांक :- २० जून, २०२३.

**विषय:- कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, बेलिफ, दिवाणी न्यायालय, व.स्तर, बुलढाणा, जिल्हा बुलढाणा यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कोवीड-१९ संबंधित कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत असताना कोव्हीड-१९ संसर्गाने मृत्यु झाल्यामुळे त्यांच्या कुटूंबियांना रु.५० लक्ष सानुग्रह सहाय्य मंजूरीबाबत.**

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक १४.०५.२०२१.

२) वित्त विभागाचे पत्र क्र.न्यायप्र-२०२०/सं.क्र.४/व्यय-९,दिनांक २८.०१.२०२१

३) सहाय्यक प्रबंधक, निरीक्षण), मुंबई उच्च न्यायालय, यांचे पत्र क्र.ब(जन)-१००१/२०२१/१३१३, दिनांक ०४.१०.२०२१

४) सहाय्यक प्रबंधक, निरीक्षण), मुंबई उच्च न्यायालय, यांचे पत्र क्र.ब(जन)-१००१/२०२१/६८१, दिनांक ०७.०४.२०२२

५) सहाय्यक प्रबंधक, निरीक्षण), मुंबई उच्च न्यायालय, यांचे पत्र क्र.ब(जन)-१००१/२०२१/४७६, दिनांक ०९.०३.२०२३

६) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, बुलढाणा यांचे पत्र जा.क्र.३४२१/२०२१, दिनांक २०.०९.२०२१

७) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, बुलढाणा यांचे पत्र जा.क्र.७७१/२०२३, दिनांक २०.०२.२०२३

८) श्रीमती कुलसुम नाज अब्दुल शकील यांचा दिनांक ०२.०७.२०२१ रोजीचा विनंती अर्ज.

**ज्ञापन :-**

दिवाणी न्यायालय, व.स्तर, बुलढाणा, जिल्हा बुलढाणा येथे कार्यरत असलेले कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, बेलिफ, यांचा कोव्हीड -१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर कर्तव्य व जबाबदारी पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक १८.०५.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

२. दिवाणी न्यायाधीश (व.स्तर), बुलढाणा, जिल्हा बुलढाणा यांनी उक्त मृत कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, बेलिफ, यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, बुलढाणा आणि सहाय्यक प्रबंधक (निरीक्षण), मुंबई उच्च न्यायालय, यांच्यामार्फत शासनास सादर केला आहे.

३. दिवाणी न्यायाधीश (व.स्तर), बुलढाणा, जिल्हा बुलढाणा यांनी कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, बेलिफ, यांना केअरवेल सुपरस्पेशालिटी हॉस्पीटल, जिल्हा औरंगाबाद येथे दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात ते कार्यालयात कर्तव्यावर हजर होते असे प्रमाणपत्र सादर केले आहे. सदरचे प्रमाणपत्र प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, बुलढाणा यांनी सत्यापित केलेले आहे.

४. केअरवेल सुपरस्पेशालिटी हॉस्पीटल, जिल्हा औरंगाबाद यांनी कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, यांचा मृत्यू हा कोविड-१९ या रोगाच्या संसर्गामुळे झालेला असल्याचे प्रमाणपत्रामध्ये नमुद केले आहे.

५. उप रजिस्ट्रार (जन्म व मृत्यू), औरंगाबाद महानगर पालिका यांनी कै.हमीद यांचा मृत्यू हा दिनांक १८.०५.२०२१ रोजी झालेला असल्याचे मृत्यू प्रमाणपत्र दिले आहे.

६. कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, यांच्या पत्नी श्रीमती कुलसुम नाज अब्दुल शकील यांनी रु.५०.०० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा दिनांक ०२.०७.२०२१ रोजीचा विनंती अर्ज प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, बुलढाणा यांना सादर केला आहे.

७. उपरोक्त बाबी लक्षात घेता, दिवाणी न्यायालय, व.स्तर, बुलढाणा, जिल्हा बुलढाणा येथे कार्यरत असलेले बेलिफ, कै.श्री. अब्दुल शकील अब्दुल हमीद, यांच्या कुटुंबियांना रक्कम रु.५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. उक्त खर्च "मागणी क्रमांक जे-१, मुख्य लेखाशीर्ष २०१४- न्यायदान, १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (२०१४०१७२) या लेखाशिर्षाखालील १३-कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ तसेच वित्त विभागाचे पत्र क्र.न्यायप्र-२०२०/सं.क्र.४/व्यय-९, दिनांक २८.०१.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०६२०१२४५२८५५१२ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2023.06.20 12:46:36 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, बुलढाणा

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव-**

१) सहाय्यक प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय, मुंबई-३२
२) दिवाणी न्यायालय, व.स्तर, बुलढाणा, जिल्हा बुलढाणा
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा
६) कार्यासन अधिकारी (कार्या-११), विधि व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७) श्रीमती कुलसुम नाज अब्दुल शकील, मिर्झा नगर रोड, एकबाल नगर, बुलढाणा, पिनकोड ४४३००१
८) निवडनस्ती, कार्यासन-६.